**मंत्रालयीन विभागातील आस्थापना विषयक**
**कामकाज विभागातील सचिवांनी हाताळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

शासन परिपत्रक क्रमांक : शाकानि-२०११/प्र.क्र.२२/१८(र. व का.)
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :९/३/२०११

वाचा : (१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : सीओएम १०९३/३५४/प्र.क्र.५९/९६/१८-अ, दिनांक ८.११.१९९६,
(२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : शाकानि १०९९/५४/१८ (र. व का.), दिनांक ५.११.१९९९.

## परिपत्रक

मंत्रालयामध्ये बऱ्याच विभागात एकापेक्षा अधिक प्रधान सचिव/सचिव कार्यरत असल्याने आस्थापना विषयक बाबींच्या संदर्भात उपरोक्त दिनांक ५.११.१९९९ चे परिपत्रक अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१) ज्या विभागामध्ये एकापेक्षा अधिक प्रधान सचिव, सचिव कार्यरत आहेत अशा विभागातील आस्थापना संबंधिचे कामकाज त्या विभागातील ज्या सचिवांकडे जास्त कक्ष/कार्यासनाचे कामकाज आहे त्या सचिवांनी हाताळावे अशा सचिवांनी विभागामधील एकूण कार्यासने व कार्यभार विचारात घेऊन विभागातील इतर सचिवांशी सल्लामसलत करुन व त्यांना विश्वासात घेवून विभागातील कार्यासने/ विषय सचिवांमध्ये नेमून देण्याचा निर्णय घ्यावा. असा निर्णय घेतांना सहयोगी सचिवांचे लेखी मत/ अभिप्राय संबंधित नस्तीवर प्राप्त करुन घ्यावे व ते विचारात घेवून निर्णय घ्यावा. याकरिता आवश्यकता भासल्यास मुख्य सचिवांची मान्यता घेण्यात यावी.

२) सर्वसाधारणपणे ज्या विषयाचा संबंध अशा विभागातील सर्व सचिवांशी येतो उदा. एका उप विभागातून दुसऱ्या उप विभागात बदल्या, नियुक्त्या करणे, सेवा आणि अर्थसंकल्पीय बाबी हाताळणे

कृ.मा.प.

इत्यादी बाबतीत आस्थापना विषयक बाबी हाताळणाऱ्या सचिवांनी आपल्या सहयोगी सचिवांच्या बरोबर सल्लामसलत करुन व त्यांना विश्वासात घेऊन निर्णय घ्यावा. याकरिता सहयोगी सचिवांचे मत नस्तीवर घेण्यात यावे व **सदर मत विचारात घेऊनच निर्णय घेण्यात यावा.**

३) खुद्द सचिवांच्या कार्यालयातील कर्मचाऱ्यांच्या बाबतीत उदा. वाहनचालक, शिपाई इत्यादी, शिस्तभंगाची कार्यवाही करण्याची वेळ आली तर त्याची प्रमुख जबाबदारी संबंधित सचिवांची राहील. आस्थापना विभागाने सदर प्रकरणे संबंधित सचिवांच्या सल्ल्यानुसार आस्थापना विषयक बाबी हाताळणाऱ्या सचिवांना सादर करावीत.

४) संबंधित सचिवांच्या उप विभागाखालील कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबी उदा. रजा, इत्यादीचे प्रकरण त्या त्या उप विभागातील नियंत्रक अधिकाऱ्यांच्या मार्फत आस्थापना शाखेला पाठविले पाहिजे. रजा इत्यादी बाबतीतला अर्ज परस्पर आस्थापना शाखेला पाठविल्यास तो अर्ज कर्मचाऱ्याला परत करुन आपल्या वरिष्ठांमार्फत पाठविण्याबाबत सूचना द्याव्या.

वरील सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३०९१९१६२५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(नंदकुमार जंत्रे)
सचिव (प्र.सु. व र. व का.)

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सर्व सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग.